**मा. उच्च न्यायालय, मुंबई व त्यांचे खंडपीठांमधील मा. न्यायाधीशांच्या ग्रंथालयाकरिता ०३ Over Head Book Scanner खरेदी करण्यास रु.९०,००,०००/- इतक्या रकमेच्या प्रस्तावास आर्थिक वर्ष २०२५-२६ साठी प्रशासकीय मान्यता प्रदान करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**विधि व न्याय विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण- २०२५/प्र. क्र.०३/का. ७**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
**दिनांक : ०३ मार्च, २०२५.**

**संदर्भ:**- १) केंद्रीय प्रकल्प समन्वयक, ई-कोर्ट प्रकल्प, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई यांचे पत्र क्र. Com/Sec/१८/२०२५, दिनांक २१/०१/२०२५.
२) विभागाच्या दिनांक २८/०२/२०२५ रोजीच्या प्रकल्प अंमलबजावणी समितीच्या बैठकीचे इतिवृत्त.

**प्रस्तावना :-**

केंद्रीय प्रकल्प समन्वयक, ई-कोर्ट प्रकल्प, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई यांनी संदर्भ क्र.०१ येथील दिनांक २१.०१.२०२५ रोजीच्या पत्रान्वये मा. उच्च न्यायालय, मुंबई व त्यांचे खंडपीठांमधील मा. न्यायाधीशांच्या ग्रंथालयाकरिता ०३ Over Head Book Scanner खरेदी करण्याचा प्रस्ताव शासनास सादर केला आहे. सदर प्रस्तावास माहिती तंत्रज्ञान संचालनालयाचे अभिप्राय घेण्यात आले आहे. सदर प्रस्तावास संदर्भ क्र. २ अन्वये विभागाच्या प्रकल्प अंमलबजावणी समितीच्या दिनांक २८/०२/२०२५ रोजी झालेल्या बैठकीत संचालक, माहिती व तंत्रज्ञान संचालनालयाने दिलेल्या अभिप्रायाच्या अनुषंगाने कार्यवाही करण्याच्या अटीच्या अधीन राहून त्याचप्रमाणे प्रस्तावांतर्गत खर्च आर्थिक वर्ष २०२५-२६ मध्ये करण्यात यावा, या अटीच्या अधीन राहून प्रस्तावास आर्थिक वर्ष २०२५-२६ साठी बैठकीत मान्यता देण्यात आली. त्यानुसार मा. उच्च न्यायालय, मुंबई व त्यांचे खंडपीठांमधील मा. न्यायाधीशांच्या ग्रंथालयाकरिता ०३ Over Head Book Scanner खरेदी करण्याच्या प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय</u> :-**

मा. उच्च न्यायालय, मुंबई व त्यांचे खंडपीठांमधील मा. न्यायाधीशांच्या ग्रंथालयाकरिता ०३ Over Head Book Scanner खरेदी करण्यास रु.९०,००,०००/- (अक्षरी रुपये नव्वद लक्ष फक्त) एवढया रकमेच्या प्रस्तावास आर्थिक वर्ष २०२५-२६ साठी प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

०३ Over Head Book Scanner खरेदीचा तपशील खालीलप्रमाणे आहे:-

| Sr.NO. | Description | Qty. | Total Cost including GST with 5 years Warranty |
|---|---|---|---|
| 1 | Over Head Book Scanner for Bombay High Court and its Benches at Nagpur and Aurangabad | 03 | 90,00,000/- |
| | **Total (Rupees Ninety Laksh only)** | | **90,00,000/-** |

२. सदर खरेदी ही संचालक, माहिती व तंत्रज्ञान संचालनालय, मुंबई यांनी दिलेल्या खाली नमूद अभिप्रायांच्या पूर्ततेच्या अधीन राहून करण्यात यावी.

Specifications given in attached letter seems to be generic. However, cost of the book scanner seems to be on higher side.

३. सदर संगणक सामग्री खरेदी ही उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाच्या दिनांक २४.०८.२०१७ व ०८.१२.२०१७ रोजीच्या शासन निर्णयानुसार GeM पोर्टलवरुन शासनाच्या विहित पध्दतीने करण्यात यावी.

४. याप्रित्यर्थ होणारा खर्च "मागणी क्र. जे-२, २०५२ सचिवालय सर्वसाधारण सेवा, (००) विधि व न्याय विभाग, (००) (०२) ई-गव्हर्नन्स प्रकल्पाच्या अंमलबजावणीसाठी तरतूद (२०५२ ५११६) या लेखाशिर्षाखाली १७ संगणक खर्च" या उदिष्टांतर्गत सन २०२५-२६ या आर्थिक वर्षातील उपलब्ध अनुदानातून भागविण्यात यावा.

५. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र. विअप्र २०१३/प्र.क्र.३०/२०१३/ विनियम, भाग-२, दिनांक १७ एप्रिल, २०१५ अन्वये वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ भाग-१ उप विभाग-२ मधील अ. क्र. २७ (अ) नियम क्र. ७६ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार तसेच विभागाच्या प्रकल्प अंमलबजावणी समितीच्या दिनांक २८.०२.२०२५ रोजी झालेल्या बैठकीत दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. यानुषंगाने निधीबाबतचे आदेश स्वतंत्रपणे निर्गमित करण्यात येतील.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०३०३११३९२२६९१२ असा आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

GIRISH RAMLING SAGANE

Digitally signed by GIRISH RAMLING SAGANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=LAW AND JUDICIARY DEPARTMENT, 2.5.4.20=8a9b5d43113d71f5bfc96922b7f43ac6c2848591ed3e1f34019d8b33a3cdb267, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=17189CF8C13CB2294570F54627B6E879FDC09820CCBF3380ED23DA0258EA27C8, cn=GIRISH RAMLING SAGANE
Date: 2025.03.03 11:40:14 +05'30'

**( गि. रा. सगणे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. महाप्रबंधक, उच्च न्यायालय, मुंबई,
२. केंद्रीय प्रकल्प समन्वयक, ई-कोर्ट प्रकल्प, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई,
३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता),-१/ २, मुंबई/नागपूर,
४. महालेखापाल (लेखा परीक्षा)-१/२, मुंबई/नागपूर,
५. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
६. अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई,
७. प्रधान सचिव, माहिती व तंत्रज्ञान विभाग, मंत्रालय, मुंबई,
८. संचालक, माहिती तंत्रज्ञान संचालनालय, मंत्रालय, मुंबई,
९. अधिदान व लेखा अधिकारी, ६ व ७ वा मजला अेपीजे हाऊस, दिनशॉ वांच्छा रोड, के. सी. कॉलेज जवळ,चर्चगेट, मुंबई-२०.
१०. संचालनालय, लेखा व कोषागारे, ६ व ७ वा मजला अेपीजे हाऊस, दिनशॉ वांच्छा रोड,के. सी. कॉलेज जवळ,चर्चगेट, मुंबई-२०.
११. कार्यासन अधिकारी १३, २३ व २४, विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई,
१२. निवड नस्ती/का. ७